# लिओ टॉलस्टॉय यांचे आयुष्यासंबंधीचे सहा धडे

रोमन झानारिक

अनुवाद- सुजाता गोडबोले

लिओ टॉलस्टॉय यांनी 'वॉर अँड पीस' ही त्याची महाकादंबरी लिहायला सुरुवात केली त्याला आता १५० वर्षांहून अधिक काळ लोटला आहे. १९ व्या शतकातील एक महान कादंबरीकार म्हणूनच बहुतांश लोक त्यांना ओळखतात. परंतु ते एक अत्यंत पुरोगामी समाजवादी विचारसरणीचे राजकीय विचारवंत होते हे फारच थोड्या लोकांना माहित आहे. १८२८ ते १९१० या आपल्या आयुष्यात आपल्या खानदानी पार्श्वभूमीमुळे मिळालेली मूल्ये त्यांनी नाकारली आणि त्यांनी अंगिकारलेल्या क्रांतिकारी, अ-पारंपारिक दृष्टिकोनामुळे तत्कालीन समाजात मोठीच खळबळ माजवली. त्यांच्या व्यक्तिमत्त्वात हा बदल कसा घडत गेला याचा शोध घेताना आज आपण कशा प्रकारे जगावे याबाबत काही महत्त्वाचे आणि आश्चर्यकारक धडे मिळतात.

रशियातील खानदानी सरदार घराण्यात टॉलस्टॉय यांचा जन्म झाला. त्यांच्या कुटुंबाची मोठी मालमत्ता होती आणि त्यांच्यापदरी शेकडो गुलाम होते. या तरुण सरदाराचे सुरुवातीचे आयुष्य मोठे ऐष -आरामाचे आणि भ्रष्टाचारी होते आणि पत्त्यांच्या व्यसनात त्यांनी बरीच संपत्ती उधळून टाकली होती. स्वतःच दिलेल्या एका कबुलीजबाबात त्यांनी म्हटले आहे:

"युद्धात मी अनेकांना ठार केले आणि लोकांना मारण्यासाठीच माझ्याशी द्वंद्वयुद्ध खेळण्याचे आव्हान मी देत असे. मी पत्त्यांच्या जुगारात हरलो, शेतकऱ्यांच्या कष्टाचा गैरफायदा घेतला, त्यांना शिक्षा दिली, हवा तसा वागलो आणि लोकांना फसवले. खोटेपणा, चोरी, सर्व प्रकारचा भ्रष्टाचार, मद्यपान, क्रौर्य, खून- कोणताच गुन्हा करायचा मी बाकी ठेवला नव्हता, आणि तरीही माझ्या सभोवतालचे लोक माझ्या वर्तणुकीचे कौतुक करत आणि मी बऱ्यापैकी सभ्य मानला जात होतो. दहा वर्षे मी अशा प्रकारे घालवली."

मग या भ्रष्ट आणि ऐष आरामी जीवनातून टॉलस्टॉय कसे काय बाहेर पडले? आणि त्यांच्या या प्रवासातून आपल्या जीवनाविषयक तत्त्वज्ञानाबाबत आपण फेरविचार कसा करावा?

**धडा १**. कोणत्याही विषयाचा पूर्वग्रह न ठेवता सर्व बाजूंनी विचार करा

नव्या अनुभवांवरून आपली मते बदलण्याची तयारी असणे ही टॉलस्टॉय यांची फार मोठी आणि महत्त्वाची क्षमता होती. ते लष्करात अधिकारी असताना १८५० च्या दशकात त्यांनी आपल्यातील या क्षमतेचा जाणीवपूर्वक विकास करण्यास सुरुवात केली. क्रिमियातील युद्धादरम्यान सिबॅस्टोपोलच्या घनघोर लढाईत टॉलस्टॉय यांचा सहभाग होता आणि त्या भयानक अनुभवातूनच ते शांततावादी बनले. १८५७ साली पॅरिसमध्ये गिलोटिनच्या साहाय्याने सार्वजनिक ठिकाणी मृत्युदंडाची शिक्षा दिली जात असलेली त्यांनी पहिली आणि तो त्यांच्या आयुष्यातील परिवर्तनाचा क्षण ठरला. धडापासून वेगळे केलेले शीर खालच्या पेटीत धाडकन पडण्याचा आवाज ते कधीच विसरू शकले नाहीत. सरकार आणि सरकारचे कायदे केवळ क्रौर्याचे आहेत इतकेच नव्हे, तर ते श्रीमंत आणि सत्ताधारी लोकांच्या फायद्याचे रक्षण करणारेही आहेत अशी त्यांची खात्री पटली. त्यांनी एका मित्राला लिहिले होते, “सरकार हे लोकांचे शोषण करण्यासाठी करण्यात आलेला एक कट तर आहेच पण शिवाय तो आपल्या नागरिकांना भ्रष्ट देखील बनवतो… म्हणून यापुढे मी कोणत्याच सरकारसाठी कोठेही काम करणार नाही.” टॉलस्टॉय यांचा प्रवास आता अराजकवादी बनण्याकडे चालू झाला होता. रशियातील झारच्या राजवटीवरील त्यांच्या टीकेला आता इतकी धार चढली होती की केवळ त्यांच्या साहित्य क्षेत्रातील प्रसिद्धीमुळेच ते तुरुंगवासापासून वाचू शकले. आपण ज्या तत्त्वांचा आणि मूल्यांचा लहानपणापासून अंगीकार केला आहे त्यांच्याबाबत मूलभूत प्रश्न विचारण्यास प्रोत्साहन देणाऱ्यांत टॉलस्टॉय यांचे नाव अग्रक्रमाने घ्यावे लागेल.

**धडा २**: सह-अनुभूती

आपल्याहून अतिशय निराळे आयुष्य जगणाऱ्या लोकांच्या अनुभवातून जाण्याचा व त्यांना समजून घेण्याचा प्रयत्न करणारे टॉलस्टॉय हे एकोणिसाव्या शतकातील एक

महत्त्वाची व्यक्ती होते असे म्हटले तर त्यात अतिशयोक्ती होणार नाही. १८६१ साली गुलामगिरीचा अंत झाल्यानंतर आणि रशियात सर्वत्र शेतकऱ्यांच्या कामाच्या महतीचे कौतुक करण्याची लाट आल्यापासून टॉलस्टॉय यांनी केवळ शेतकऱ्यांसारखे कपडे घालायला सुरुवात केली इतकेच नव्हे, तर आपल्या शेतांमध्ये त्यांच्या बरोबरीने शेताच्या नांगरणीसह आपल्या हाताने त्यांच्या घरांची दुरुस्ती देखील करण्यास सुरुवात केली. एका खानदानी सरदाराने असे काम करणे हे त्याकाळी विशेष होते. आपण त्यांचे पालनकर्ते असल्याचा काहीसा भाव जरी त्यात असला, तरी टॉलस्टॉय यांचे शेतकऱ्यांबरोबर राहणे वाढत गेले आणि शहरातील साहित्यिक आणि प्रसिद्ध व्यक्तींना ते टाळू लागले. रुसो आणि प्रुडहोन यांच्या मुक्त आणि समतेवर आधारित कल्पनेनुसार त्यांनी शेतकऱ्यांच्या मुलांसाठी प्रायोगिक तत्त्वावर एक शाळाही सुरु केली आणि त्यात ते स्वतः देखील शिकवत असत. त्या काळातील अनेक खानदानी सरदार आपण ग्रामीण मजुरांच्या बाजूचे असल्याचा दावा करत असले, तरी त्याचा प्रत्यक्ष अनुभव घेतल्याखेरीज तुम्हाला त्यांचे प्रश्न कधीच समजणार नाहीत असे टॉलस्टॉय यांचे मत होते.
इल्या रेपिन यांनी 'नांगरणारा टॉलस्टॉय' या १८८९ सालच्या पुस्तकात म्हटले आहे की, बऱ्याच वेळा आपली लेखणी खाली ठेवून टॉलस्टॉय शेतात काम करायला जात असत. त्याच्या लिहिण्याच्या टेबलाशेजारीच एक कोयता आणि करवत भिंतीशी उभी केलेली असे. चांभाराची हत्यारे देखील एका टोपलीत जमिनीवर ठेवलेली असत.

**धडा ३**: फरक पडेल असे वागा

वरिष्ठ वर्गातील साहित्यिक असूनही इतर लोकांच्या कष्टमय परिस्थितीत सुधारणा व्हावी म्हणून टॉलस्टॉय यांनी प्रत्यक्ष कृती करण्याचा मार्ग निवडला हे विशेष आहे. दुष्काळग्रस्तांसाठी त्यांनी केलेल्या कामातून त्यांना शेतकऱ्यांप्रती किती आस्था होती हे उघड दिसून येते. १८७३ सालच्या दुष्काळानंतर त्यांनी ॲना कॅरेनिना या कादंबरीचे लेखन वर्षभर थांबवले आणि उपाशी जनतेसाठी मदत कार्य सुरु केले. आपल्या एका नातेवाईकाला ते म्हणाले, "कल्पनेतील पात्रांसाठी मी प्रत्यक्षातील माणसांशी असलेला संबंध तोडू शकत नाही." आपली इतकी महत्त्वाची कलाकृती अशी अर्धवट सोडणे हा त्यांच्या घरच्यांच्या आणि मित्रपरिवाराच्या मते वेडेपणा होता. पण टॉलस्टॉय याबाबत

ठाम होते. १८९१ च्या दुष्काळानंतरही त्यांनी परत तसेच केले आणि पुढची दोन वर्षे आपल्या कुटुंबियांसमवेत जगभरातून पैसे गोळा करून अन्नछत्र चालवले. एखादा सुप्रसिद्ध लेखक आपले लिखाण पूर्ण करण्याऐवजी मानवतावादी दृष्टिकोनातून दोन वर्षे मदतकार्यात घालवेल अशी आपण कल्पना तरी करू शकू का?

**धडा ४**: साध्या राहणीचा स्वीकार

टॉलस्टॉय यांची सर्वात मोठी देणगी - आणि म्हणूनच एक छळणारी चिंता - म्हणजे आयुष्याचा अर्थ शोधण्याचा त्यांचा सततचा प्रयत्न . आपण का आणि कसे जगावे, आणि आपल्या सर्व संपत्तीचा व प्रसिद्धीचा अर्थ तरी काय याचा ते कायम विचार करत असत. १८७० च्या दशकाच्या अखेरीला या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर न मिळाल्याने त्यांनी मानसिक संतुलन गमावले आणि आत्महत्येचे विचार त्यांच्या मनात घोळू लागले. परंतु, जर्मन तत्त्वज्ञ शोपेनहॉव्हर, बौद्ध वाङमय आणि बायबल यांच्या अभ्यासात स्वतःला झोकून दिल्यानंतर त्यांनी क्रांतिकारी ख्रिश्चन धर्माचा मार्ग अनुसरला. यात कोणत्याही प्रस्थापित धर्माला- ते लहानपणापासून ज्या सनातन चर्चच्या वातावरणात वाढले होते त्यालाही- स्थान नव्हते. त्याऐवजी त्यांनी अत्यंत काटकसरीची आणि अध्यात्मिक जीवनशैली स्वीकारली. मद्यपान आणि धूम्रपान यांचा त्याग करून ते पूर्णपणे शाकाहारी बनले. मालमत्ता सामाईक मालकीची असणाऱ्या अतिशय साध्या आणि स्वावलंबी, आदर्शवादी समाजाची निर्मिती करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. या 'टॉलस्टॉयवादी' समाजाचा जगभर प्रसार झाला आणि त्यातूनच गांधींनी १९१० साली 'टॉलस्टॉय फार्म' नावाचा आश्रम स्थापन केला.

**धडा ५** : विरोधाभासांपासून सावधान

टॉलस्टॉय यांच्या नवीन साध्या आयुष्यात देखील संघर्ष आणि विरोधाभास होता. सर्व जगावर प्रेम करण्याचा संदेश देणारे टॉलस्टॉय आपल्या पत्नीशी कायम भांडत असत. आणि समतेचा प्रसार करतानाही त्यांनी आपली मालमत्ता आणि सुखाची जीवनशैली पूर्णपणे सोडून दिली नव्हती. आपल्या म्हातारपणात देखील ते अनेक नोकर-चाकर असलेल्या महालासारख्या घरात राहत असत. आपली सर्व मालमत्ता शेतकऱ्यांमध्ये

वाटून टाकण्याचा विचार मांडल्यावर त्यांची पत्नी व मुले अतिशय चिडली म्हणून अखेर त्यांनी तो विचार सोडून दिला. परंतु १८९० च्या दशकाच्या सुरुवातीला, आपल्या कुटुंबाची इच्छा झुगारून, साहित्यिक कलाकृतींवरील आपला स्वामित्त्वहक्क त्यांनी सोडून दिला, म्हणजे उत्पन्नाच्या एका मोठ्या स्त्रोतावर त्यांनी पाणी सोडले. त्यांच्या आयुष्याच्या अखेरच्या काळात लेखक आणि पत्रकार या ऋषितुल्य व्यक्तिमत्त्वाला भेटण्यास येत असत, तेव्हा जगातील हा प्रसिद्ध लेखक कामगारांसोबत लाकूड फोडताना किंवा आपले बूट शिवत असलेला पाहून त्यांना आश्चर्याचा धक्का बसत असे. टॉलस्टॉय यांच्या आयुष्याची सुरुवात अत्यंत संपन्न वातावरणात झाली असूनही त्यांचे परिवर्तन, ते जरी परिपूर्ण नसले, तरीही कौतुक करण्याजोगेच आहे.

**धडा ६**: सामाजिक वर्तुळाचा विस्तार करा

टॉलस्टॉय यांच्याकडून शिकण्यासारखा आणि आचरणात आणण्याजोगा सर्वात महत्त्वाचा धडा म्हणजे आपल्या धारणा व समज आणि गैरसमज यांना आव्हान देण्याचा आणि जगाकडे पाहण्याचा नवा दृष्टिकोन अंगिकारण्याचा सर्वोत्कृष्ठ मार्ग म्हणजे आपल्याहून निराळे विचार आणि जीवनशैली असणाऱ्या लोकांच्या समुदायात वावरणे. म्हणूनच त्यांनी मॉस्कोतील लोकांचा सहवास टाळून जमिनीवर प्रत्यक्ष काम करणाऱ्या मजुरांसोबत जास्त वेळ घालवणे पसंत केले. बहुतेक लोक, मग ते श्रीमंत व्यावसायिक, सत्ताधारी राजकारणी किंवा साधे चोर असोत, आपली विचारसरणी आणि विश्वास हाच नैतिक आणि कौतुकास्पद असल्याचे मानतात. त्यांनी लिहिले होते, “आपला जीवनविषयक दृष्टिकोन अबाधित रहावा म्हणून अर्थातच लोक समविचारी लोकांच्यातच राहतात आणि त्यातच आपले स्थान कायम करून घेतात.”

आपल्याला जर आपल्या आदर्शांचा आणि मूल्यांचा फेरविचार करायचा असेल, तर आपण टॉल्स्टॉयचे उदाहरण पुढे ठेवून आपल्या विरोधी विचारसरणी आणि अनुभव असलेल्या लोकांसमवेत राहायला हवे. आपला प्रवास आपल्या वर्तुळाच्या बाहेरील जगात घडायला हवा.